कोवीड १९-तपासणीसाठी राज्यातील एनएबीएल व आयसीएमआर मान्यता प्राप्त प्रयोगशाळेतून आरटीपीसीआर तपासणीसाठी कमाल दर निश्चित करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** कोरोना-२०२०/प्र.क्र.१२३/आरोग्य- ५

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत,
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ०७ ऑगस्ट, २०२०

**संदर्भः-**

१) **शासन निर्णय समक्रमांक दिनांक** ०२.०६.२०२०.

२) **शासन आदेश समक्रमांक दिनांक** १३.०६.२०२०.

३) **शासन आदेश समक्रमांक दिनांक** ०४.०७.२०२०.

४) **शासन निर्णय समक्रमांक दिनांक** ११.०७.२०२०.

५)आयसीएमआरच्या दिनांक २२.०५.२०२० व दिनांक २३.०६.२०२० च्या मार्गदर्शक सूचना

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार भारतीय आयुर्विज्ञान संस्था व एनएबीएल मान्यता प्राप्त खाजगी प्रयोगशाळांकडून कोवीड-१९ साठी असलेल्या आरटीपीसीआर तपासणीचे दर निश्चिती करण्यासाठी समिती गठित करण्यात आली होती. यासमितीने तत्कालीन लॉकडाऊन परिस्थितीत मर्यादित साधन उपलब्धता लक्षात घेऊन, खाजगी प्रयोगशाळांशी चर्चा करून, खाजगी प्रयोगशाळानी आरटीपीसीआर तपासणीसाठी आकारावयाच्या दराबाबतचा अहवाल शासनास सादर केला होता. त्यानुसार दिनांक १३.०६.२०२० व दिनांक ०४.०७.२०२० च्या आदेशानुसार विविध परिस्थितीत खाजगी प्रयोगशाळांनी आरटीपीसीआर तपासणीसाठी आकारावयाचे दर निश्चित करण्यात आले होते. तद्नंतर संदर्भ क्र. ४ मध्ये नमूद शासन निर्णयानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय आयुर्विज्ञान संस्थेने शिफारस केलेल्या विविध कंपन्यांनी उत्पादित केलेल्या रॅपिड ॲन्टीबॉडी चाचण्या यांच्या वापराबाबत शिफारस करणे तसेच शिफारस केलेल्या चाचण्यांच्या अनुषंगाने प्रसिध्द करावयाच्या अभिव्यक्ती स्वारस्याचा मसुदा तयार करणे, सदर चाचण्या कशाप्रकारे कराव्यात याची शिफारस करणे इ. बाबी निश्चित करण्यासाठी समिती स्थापन करण्यात

आली होती. तसेच आरटीपीसीआर चाचणीचे दर निश्चित करण्याचेही कार्य या समितीवर सोपविण्यात आले होते.

मिशन बिगीन अंतर्गत राज्यातील लॉकडाऊनमध्ये शिथिलता आणण्यात आली आहे. त्यामुळे तपासणीसाठी लागणारे रिएजंट्स, व्हीटीएम किट्स व पीपीई किट्सची उपलब्धता वाढल्याने, याच्या किमती कमी झाल्या आहेत. पर्यायाने तपासणीच्या खर्चातही कपात होणे आवश्यक होते. याबाबी लक्षात घेऊन प्रयोगशाळा व किट्स उत्पादक कंपन्या यांच्याशी चर्चा करून या समितीने आपल्या शिफारशींसह आपला अहवाल शासनास सादर केला आहे. शासनाने सदर अहवाल स्विकृत केला असून, त्यानुसार आरटीपीसीआर चाचणीचे सुधारित दर निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास्तव शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

खाजगी प्रयोगशाळांनी कोवीड-१९ साठी आरटीपीसीआर तपासणीच्या दराबाबतचे संदर्भ क्र. २ व ४ मध्ये नमूद केलेले आदेशानुसार निश्चित केलेले दर अधिक्रमित करून आरटीपीसीआर तपासणीचे सर्व करांसहित सुधारित दर खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत. सदर दर निश्चिती ही साथरोग अधिनियम, १८९७ नुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या निर्देशानुसार निश्चित करण्यात येत आहेत. राज्यात कोणत्याही खाजगी प्रयोगशाळेला या कमला मर्यादेपेक्षा अधिक दर आकारता येणार नाहीत.

| क्र. | तपशील | शासन आदेश दिनांक १३.०६.२०२० ०४.०७.२०२० व नुसार निश्चित दर (रूपयांत) (प्रती तपासणी) | सर्व करांसहित सुधारित दर रूपयात (प्रती तपासणी) |
|---|---|---|---|
| 1 | Pick of sample from collection site, transport and reporting of sample (All necessary consumable like VTM, PPE etc. for collection will be borne by sample provider) | 2200/- | 1900/- |
| 2 | Collection of samples from drive through sample collection kiosks, sample collection drives, Covid Care Collection Centres, Hospital Clinic,Quarntine Centres of Laboratories, ect. (All necessary consumable like VTM, PPE, RNA extraction kit, RtPCR Kit etc. will be borne by laboratory) | 2500/- | 2200/- |
| | Collection of patient sample from residence, transport of sample, testing and reporting of | 2800/- | 2500/- |

| | | | |
|---|---|---|---|
| 3 | sample, (All necessary consumable like VTM, PPE, RNA extraction kit, RtPCR kit, etc. will be borne by laboratory) | | |

दिनांक १३.०६.२०२० व दिनांक ०४.०७.२०२० च्या आदेशातील नमूद अटी व शर्ती पुर्वीप्रमाणेच कायम रहातील. सदर आदेश हा निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०३१२०६२९४६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b4e19876ab3eec36e3a3b988441648ab87470cdfe66b14cfbe7ac9bd770485c1, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2020.08.07 15:36:07 +05'30'

**( अर्चना वालझाडे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. जिल्हाधिकारी (सर्व).
४. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,(सर्व)
५. महानगरपालीका आयुक्त (सर्व)
६. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई/पुणे
७. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई